/

**कोल्हापूर जिल्हयांतील चिकोत्रा खो-यातील ६ गावांमध्ये समन्यायी पाणी वाटपाच्या पथदर्शी प्रकल्पास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**जलसंपदा विभाग,**

शासन निर्णय क्रमांक – चिकोत्रा – २०११/प्र.क्र.२४८/जसंनि
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई – ४०००३२.
दिनांक : ०७ जुलै, २०१२.

संदर्भ :- १) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे पत्र क्रमांक- मकृखोविम/(१६/०५)/(२३३/२००५)/-भाग-२ /मप्र-१ /७७१८, दि. २६/०९/२०११.

**प्रस्तावना :-**

चिकोत्रा ही कोल्हापूर जिल्हयांतील दक्षिण भागातील छोटी नदी असून ती पुढे पूर्व वाहिनी असलेल्या वेदगंगा नदीला मिळते व वेदगंगा पुढे महाराष्ट्र राज्याची सीमा ओलांडून कर्नाटकच्या हद्दीत कृष्णा नदीला मिळते. चिकोत्रा नदीच्या खो-यामध्ये कागल तालुक्यातील ३२, भुदरगड तालुक्यातील १५ व आजरा तालुक्यातील ५ अशी एकूण ५२ गावे येतात. चिकोत्रा खो-याचे क्षेत्रफळ ३२७.६४ चौ.कि.मी.असून या ५२ गावांची एकूण जमिन ३२,७६४ हेक्टर आहे. त्यापैकी लागवडीलायक जमिन २४,७६६ हेक्टर इतकी आहे.

कोल्हापूर जिल्हयातील चिकोत्रा खो-यातील एकूण ५२ गावांमध्ये समन्यायी पाणी वाटप करण्याच्या दृष्टीने प्रथमतः ६ गावात प्रायोगिक तत्वावर असा पाणी वाटपाचा प्रकल्प राबविण्याचे समन्यायी पाणी हक्क परिषद,पुणे यांनी प्रस्तावित केले होते व त्यासाठी त्यांनी पुढील मागण्या मांडल्या होत्या.

१. एकात्मिक जलसंधारण प्रकल्पाला शासनाने मान्यता द्यावी.
२. पाणी वापरण्याची परवानगी वैयक्तिक शेतक-यांना न देता गावच्या सहकारी पाणी वापर संस्थांना देणे.
३. पाण्याचे वाटप, वापर, एकूण जल व्यवस्थापन व देखभाल दुरुस्ती या सर्व कामाची जबाबदारी गावच्या सहकारी पाणी वापर संस्थेस करारनामा करुन देणे.
४. धरणाच्या उपसा सिंचनाकरिता देण्यात येणारे पाणी शक्य असेल तेथे जलसंधारणेच्या दृष्टीने घन मापन पध्दतीने मोजून देणे.
५. धरणाचे पाणी वापरण्याकरिता उपसा सिंचन व्यवस्थेचा ८० टक्के खर्चाचा वाटा शासनाने उचलणे. उरलेला २० टक्के वाटा पाणी वापर संस्था वर्गणी रुपाने उभा करतील.

निर्णय :- या विषयावर विभागाने सादर केलेल्या टिप्पणीवर मंत्रिमंडळाने चर्चा केली आणि चिकोत्रा खो-यातील उपलब्ध पाण्याचे एकात्मिक संधारण लोकसंख्येच्या आधारावर समन्वयी वाटप व वापर या विषयी समन्यायी पाणी हक्क परिषद, पुणे, यांच्या प्रस्तावावरील डॉ.माधवराव चितळे, यांच्या शिफारशी, या शिफारशींवरील पाटबंधारे विभागाचे अभिप्राय, राष्ट्रीय जलनिती मधील तरतुदी, पाणी वाटपाचे प्रचलित धोरण यांचा एकत्रित विचार करुन शिफारशींच्या स्विकृतीबाबत मंत्री(पाटबंधारे), यांचे अध्यक्षतेखाली मंत्रिमंडळाची उपसमिती नेमण्याचा निर्णय घेतला. उपसमितीने अहवाल ३ महिन्यात सादर करावा असे निर्देश मंत्रिमंडळाने दिले.

सदर निर्णयास अनुसरुन मंत्रिमंडळ उपसमितीचे गठण करण्यांत आले. तद्नंतर शासन निर्णय क्रमांक- कृपातल-२००५/(२/०५)/जसंनि, दिनांक २/४/०५ नुसार या उपसमितीचे तत्कालीन मा. उपमुख्यमंत्री यांचे अध्यक्षतेखालील मंत्रीमंडळ उपसमिती असे पुनर्गठण करण्यांत आले.

तत्कालीन मा. उपमुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रीमंडळ उपसमितीच्या दिनांक ६/१०/२००५, दि.२८/१२/२००५, दि.२१/०९/२००६, व दि.२०/११/२००८ रोजी बैठका संपन्न झाल्या.

दिनांक २०/११/२००८ रोजी तत्कालीन मा.उपमुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रीमंडळ उपसमितीची ५ वी अंतिम बैठक मुंबई येथे संपन्न झाली. या बैठकीत ६ गावांच्या रु.२४.१६ कोटी किंमतीच्या पथदर्शी प्रकल्पाच्या अंदाजपत्रकांची नोंद घेण्यात येवून तांत्रिक तपासणीनंतर मंत्रिमंडळासमोर सादर करण्यास तत्वतः मान्यता दर्शविण्यात आली.

मा. राज्यपाल महोदय, यांनीही दि. ०७/११/२००९ च्या पत्रान्वये सदर पथदर्शी प्रकल्पास संमती दिली आहे. तसेच सदर पथदर्शी प्रकल्पास महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाने दि. १७/०४/२०१० च्या ज्ञापनान्वये काही अटीच्या अधीन राहून मान्यता दिली आहे.

प्रस्तुत विषयाबाबत मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली दि.२८.६.२०११ रोजी झालेल्या बैठकीत मा. मुख्यमंत्री महोदयांनी खालील,प्रमाणे निर्देश दिले.

चिकोत्रा खो-यातील समन्यायी पाणी वाटपाच्या सहा गावांच्या पथदर्शी प्रकल्पाचा प्रस्ताव मंत्रीमंडळ उपसमितीसमोर सादर करावा. यामध्ये खालील बाबींचा समावेश असावा.

अ) पथदर्शी प्रकल्पाच्या भांडवली खर्चाच्या २० टक्के हिस्सा लोकसहभागातून उभा करावा.

ब) पथदर्शी प्रकल्पाच्या भांडवली खर्चाच्या संस्थेच्या हिश्श्यापोटी वित्तीय दायित्वाची शासन हमी घेणार नाही.

क) पथदर्शी प्रकल्पाच्या पाणी वापराचे घनमापन पध्दतीने आकारणी तसेच उपरोक्त योजनेच्या उपसा यंत्रणेचा विद्युत भार पाणी वापर संस्थेनेच भरावा.

ड) उपरोक्त पथदर्शी प्रकल्पाच्या देखभाल व दुरुस्तीचा खर्च पाणी वापर संस्थेने करावा.

(७) प्रकल्पातील पंपगृह, अनुषंगिक घटक व वितरण प्रणालीचे संकल्पन मध्यवर्ती संकल्प चित्र संघटना, नाशिक यांचेमार्फत प्रमाणित (Vetting) करुन घ्यावे.

(८) प्रकल्पासाठी लागणारी खाजगी जमिन समन्यायी पाणी हक्क परिषद, पुणे यांनी संपादीत करावी व याबाबत समन्यायी पाणी हक्क परिषद, पुणे यांचेकडून हमी घेण्यात यावी, तसेच भविष्यात शासनाकडून जमिन संपादीत करण्यासाठी अनुदान देण्यात येणार नाही.

(९) योजना पूर्ण झाल्यानंतर त्या योजनेचे परिचालन, देखभाल व दुरूस्ती (Operation, Maintenance and repairs) याची जबाबदारी संस्था घेईल आणि पाणी उचलण्यासाठी जो विजेचा खर्च येईल तो देखील संस्थेमार्फत नियमितपणे भरणा केला जाईल, अशा स्वरूपाच्या संस्थेकडून घेण्यात आलेल्या प्रतिज्ञापत्रातील अटींचा समावेश करून संबंधीत संस्थाशी करारनामा करण्यात यावा.

मागणी क्रमांक आय — ५

"४७०२, लहान पाटबंधा-यावरील भांडवली खर्च

१९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका

(००) (०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (४७०२ ४७९ ४)

हा निर्णय दि. २३/०५/२०१२ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीत जलसंपदा विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०१२०७०७११३४२२०९०० असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( रा.वा.पानसे )
शासनाचे सह सचिव

प्रत,
मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
मा.मंत्री,जलसंपदा(कृखोपामं वगळून) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई
मा.मंत्री,जलसंपदा(कृखोपामं) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई
मा.राज्यमंत्री,वित्त,ऊर्जा,नियोजन,जलसंपदा,संसदीय कार्य आणि राज्य उत्पादन शुल्क यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई
मा.मुख्य सचिव, यांचे स्वीय सहायक ,मंत्रालय,मुंबई
प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.